"पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरणास सहाय्य" योजनेअंतर्गत विविध विकास कामांकरिता प्राधिकरणास निधी वितरीत करण्याबाबत.

सन २०१६-१७ साठी लेखाशिर्ष (२२१७ ९६१६) खाली रक्कम रू. ८ कोटी.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक-पैविप्रा-२०१७/प्र.क्र.२७/नवि-१६
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २२ मार्च, २०१७

वाचा :- (१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. पैअविप्रा-२०१२/ प्र.क्र.१४०/नवि-१६ दिनांक १८ मे,२०१३.

(२)जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरण, औरंगाबाद यांचे पत्र क्र. २०१७/पैआविप्रा/निधी-विप्रप/कावि-/दिनांक १६ मार्च,२०१७.

(३)वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक २० एप्रिल,२०१६.

(४) वित्त विभागाचे शासन परिपत्रक संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१ /कोषा. प्रशा.-५ ,दिनांक १० मे,२०१६.

(५)वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.- अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक ८फेब्रुवारी,२०१७.

प्रस्तावना :-

पैठण या ऐतिहासिक,धार्मिक व पर्यटन क्षेत्रातील महत्वाच्या शहराच्या विकासासाठी पैठण व आपेगांव विकास प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे.संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरणाअंतर्गत विविध विकास कामांच्या रू.२०९.९२३५ कोटीचा विकास आराखडा मंजूर करण्यात आला आहे.सदर विकास आराखड्यातील कामे राबविण्यासाठी शासनस्तरावरून "एक विशेष बाब" म्हणून १०० टक्के अनुदान देण्यात येते.आतापर्यंत शासनस्तरावरून एकूण रू. १११.५६ कोटी प्राधिकरणास

वितरीत करण्यात आले आहेत.संदर्भाधीन क्र. (३) व (४) येथील वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार "पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरणास सहाय्य" या योजनेअंतर्गत "पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरणास मंजूर आराखड्यातील विविध विकास कामांकरीता "अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर" निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरणाअंतर्गत मंजूर केलेल्या विकास आराखड्यातील विविध विकास कामांकरिता "पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरणास सहाय्य" या योजनेअंतर्गत **रक्कम रु.८,००,००,०००/-( अक्षरी रक्कम आठ कोटी मात्र )** इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर विकास आराखड्यातील मंजूर कामे दिनांक ३१ मार्च, २०१८ पर्यंत पूर्ण करण्यात यावीत. नियंत्रक अधिकारी यांनी सदर कालमर्यादेत कामे पूर्ण होतील याची दक्षता घ्यावी.

३. विकास आराखड्याअंतर्गतच्या कामांना "ई-निविदा" कार्यप्रणालीचा अवलंब करणे बंधनकारक राहील.याबाबत सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच शासनाने निर्गमित केलेल्या अद्यावत मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. "ई-निविदा" कार्यप्रणालीचा अवलंब करण्यात येत असल्याची खातरजमा करावी.

४. विकास आराखड्याअंतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे, काम गुणवत्तेनुसार झाले आहे किंवा कसे तसेच मंजूर कामावरच मंजूर निधी खर्च झाला आहे किंवा कसे हे पाहण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांची राहील.

५. सदर कामावर करण्यात येणा-या खर्चामुळे आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

६. निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे व नियमांचे तसेच विहीत प्रक्रियेचे अवलंबन करण्यात यावे. निधी खर्च करण्याबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील सूचनांचा व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत (Financial Power) भंग होणार नाही तसेच, कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

**७.** यापुर्वी या योजनेखाली झालेल्या खर्चाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे व सदर शासन निर्णयान्वये उपलब्ध करून दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित प्रपत्रात संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांची राहील.तसेच, उपयोगिता प्रमाणपत्राची एक प्रत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचेकडे सादर करावी.

८. दिनांक ३१ मार्च २०१८ अखेर ही निधी खर्च करण्याची मुदत संपल्यानंतर आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ करीता वितरीत करण्यात येणा-या सर्व निधीच्या उपयोगिताचे प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे. सदरची उपयोगिताचे प्रमाणपत्र एकत्रितरीत्या संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करून खर्चित व अखर्चित निधीचा अहवाल शासनास सादर करावा.

९. या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे वितरण करण्यासाठी जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांना नियंत्रक अधिकारी तसेच, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरचा निधी नियंत्रक अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांचेकडे वर्ग करण्यात येत आहे.

**१०.** संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये "पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरणास सहाय्य" या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून, सदर शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती बंधनकारक राहतील.

**११.** या शासन निर्णयान्वये निधी वितरीत करावयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ करीता वितरीत केलेल्या निधीपैकी १००% खर्चाचे विनियोग झाले असल्याची खातरजमा आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी व असे उपयोगिता प्रमाणपत्र देयकासोबत जिल्हा कोषागारात सादर करावे.

**१२.** या लेखाशिर्षाखाली यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत याची खातरजमा आहरण व संवितरण अधिका-याने करावी.असे गंभीर आक्षेप असल्यास निधी आहरीत करू नये.

**१३.** या लेखाशिर्षाखाली एक वर्षावरील जुने संक्षिप्त देयक प्रलंबित असल्यास निधी आहरीत करू नये.असे प्रस्ताव वित्त विभागाची सहमती घेण्यासाठी नगर विकास विभागाकडे पाठविण्यात यावेत.

**१४.** आहरण व संवितरण अधिका-याने सदरचे अनुदान दिनांक ३१ मार्च २०१८ अखेर खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी. दिनांक ३१ मार्च २०१८ अखेरचा अखर्चित निधी संबधितांनी व्याजासह शासनाच्या खाती तात्काळ जमा करावा.

**१५.** वितरीत करण्यात येणारा निधी ठेव बांधकामाचे स्वरूपात सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करू नये.

**१६.** या शासन निर्णयान्वये निधी वितरीत करावयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे या लेखाशिर्षाखाली यापुर्वी वितरीत केलेला निधी अखर्चित असल्यास, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ व शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय दिनांक ६ जून,२००८ अन्वये कार्यवाही करावी.

**१७.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक २० एप्रिल,२०१६ मधील सोबतच्या परिशिष्टाच्या अ.क्र. (९) मधील तपासणी सूचीतील अ.क्र. (५),(६),(७),(८) व (९) तसेच, शासन परिपत्रकामधील परिच्छेद (७) ते (१८) पैकी परिच्छेद क्र. (७),(८),(१२),(१३),(१४),(१५), (१६) व (१८) लागू होत नाहीत.तसेच, वित्त विभागाचे शासन परिपत्रक संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१ /कोषा.प्रशा.-५ ,दिनांक १० मे,२०१६ च्या परिच्छेद (अ) मधील अ.क्र. (६),(८),(९) व (१०) लागू होत नाहीत.उर्वरीत बाबींची उपरोक्त परिच्छेदांनुसार पुर्तता करण्यात आली आहे.

**१८.** यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगरविकास,८०, सर्वसाधारण,१९९, इतर अशासकीय संस्थांना सहाय्य, (००) (०९) पैठण आपेगाव शहर विकास प्राधिकरणास सहाय्य,३१ , सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१७ ९६१६), ३१, सहाय्यक अनुदान, या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**१९.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल,२०१६ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**२०.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक

२०१७०३२२१४५७४४१७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: CN = Vivek Shankar Kumbhar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = UNDER SECRETARY
Date: 2017.03.24 12:19:59 +05'30'

(विवेक कुंभार)

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
३. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
४. जिल्हाधिकारी, औरंगाबाद
५. मा.राज्यमंत्री (नगरविकास ) यांचे खाजगी सचिव
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, औरंगाबाद
१३. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन नवि-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.